स्वामी रामानंद तीर्थ ग्रामीण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अंबाजोगाई येथील १६० मुलींच्या वसतीगृह इमारत (भाग-१) कामास सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : जीसीए-२०२३/प्र.क्र.०५/प्रशा-१,
गोकुलदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन गो.ते.संकुल,
९ वा मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ००१.
दिनांक : ०५ जुलै, २०२४

**वाचा :**
१) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र.संवैशिवसं/स्वारातीग्रा राशावैमअंबा /१६०मुलीवसतिगृहइमासुप्रमा/३२२७, दिनांक २१.१२.२०२२
२) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र.संवैशिवसं/ स्वारातीग्रा राशावैमअंबा/१६०मुलीवसतिगृहइमासुप्रमा/आय-प/१९९३, दिनाक १४.०७.२०२३
३) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, शासन निर्णय, समक्रमांक दि.२९.०७.२०१७
४) वित्त विभाग,पत्र क्र.सुप्रमा-२०२४/प्र.क्र.३१/अर्थ -२, दि. १५.०३.२०२४

**प्रस्तावना :**

स्वामी रामानंद तीर्थ ग्रामीण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अंबाजोगाई येथील १६० मुलींच्या वसतीगृह इमारत (भाग-१) च्या बांधकाम करण्याकरीता बांधकामाच्या अंदाजपत्रकात वाढ झालेली असल्यामुळे सुधारीत अंदाजपत्रकास मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव व्यय अग्रक्रम समितीसमोर ठेवण्यात आलेला होता. सदर सुधारीत प्रस्तावास व्यय अग्रक्रम समितीने सहमती दर्शविली असल्याने सदर सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

स्वामी रामानंद तीर्थ ग्रामीण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अंबाजोगाई येथील १६० मुलींच्या वसतीगृह इमारत (भाग-१) च्या बांधकाम करण्यासाठी बांधकामाच्या अंदाजपत्रकात वाढ झालेली असल्यामुळे रुपये ३०,०४,६७,७३१/- (रुपये तीस कोटी, चार लक्ष, सदूसष्ट हजार, सातशे एकतीस मात्र) इतक्या रक्कमेच्या बांधकाम अंदाजपत्रकास व्यय अग्रक्रम समितीने त्यांच्या दिनांक १२.०३.२०२४ रोजीच्या बैठकीत मान्यता दिलेली आहे. सदर मान्यता व पुढील अटींच्या अधीन राहून या शासन निर्णयाव्दारे सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | बांधकामाचे नाव | मूळ प्रशासकीय मान्यता किंमत | अधिक्य किंमत / वाढीव किंमत | सुधारीत अंदाजित किंमत |
|---|---|---|---|---|
| १. | Revised Estimate for Construction of 160 Girls Hostel Building for S.R.T.R. Medical College Ambajogai, Dist Beed (Part-1) | १०,८०,३९,५०४ | १९,२४,२८,२२७ | ३०,०४,६७,७३१ |
| एकूण | | १०,८०,३९,५०४ | १९,२४,२८,२२७ | ३०,०४,६७,७३१ |

अटी :-

१) सदर विषयी संदर्भ ०३ येथे नमूद शासन निर्णयातील सर्व अटी व लेखाशीर्षाचे माध्यम कायम राहील.

२) सदर सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेतच काम पूर्ण करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३) सदर योजनेची अंमलबजावणी करताना प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC तत्वे, वित्तीय मर्यादा कार्यपद्धती अनुसरणे, आवश्यकतेनुसार राज्य तांत्रिक सल्लागार समितीने प्रकल्पाच्या व कामाच्या अनुषंगाने निदेशांचे व त्रुटींची पुर्तता करण्यात यावी.

४) सदर सुधारीत प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी, निविदाविषयक क्षेत्रिय निर्णय किंवा अनियमितता यास मान्यता गृहीत धरली जाणार नाही, अशा प्रकरणाची तपासणी त्यावेळच्या प्रचलित शासन नियमानुसार करण्यात यावी.

२. सदर शासन निर्णय, मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक १२.०३.२०२४ रोजी आयोजित व्यय अग्रक्रम समितीच्या बैठकीत प्राप्त सहमती व त्यानुषंगाने प्राप्त इतिवृत्तानुसार तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-१, उप विभाग-५, अनुक्रमांक-९, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ नुसार प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७०५१४१५१९३६१३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUDHIR JAYA SHETTY

Digitally signed by SUDHIR JAYA SHETTY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E9D37D499A521B728AEB3DC8EC38B759420308B9FD7816002B4AF0FFBF1111D7, cn=SUDHIR JAYA SHETTY
Date: 2024.07.05 01:11:50 +05'30'

**(सुधीर जया शेट्टी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
२. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
३. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सचिव (वि.सु.), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७. आयुक्त (वै.शि.), वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई
८. उपसचिव मा.उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई

९. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
१०.मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, छत्रपती संभाजीनगर
११.अधिष्ठाता, स्वामी रामानंद तीर्थ ग्रामीण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अंबाजोगाई
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, बीड
१३.अवर सचिव (कार्या क्र.अर्थ-२), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.निवडनस्ती (प्रशा-१).